**दिनांक ३० जून, २०१७ ते २ जुलै, २०१७ या कालावधीत गांधी नगर, गुजरात येथे आयोजित करण्यात येणा-या Textile India - २०१७ या आंतरराष्ट्रीय प्रदर्शनामध्ये भागीदार राज्य (Partner State) म्हणून सहभागी होण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय, जावप्र-२९१७/प्र.क्र.२८/टेक्स-१(ब)**
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २८ जून, २०१७.

**पहा** :- शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. पुनर्वि-२०१७/प्र.क्र.४७/१७/१७-स, दिनांक २७ जून, २०१७

**प्रस्तावना :-**

वस्त्रोद्योग मंत्रालय, भारत सरकार यांच्या वतीने दिनांक ३० जून, २०१७ ते २ जुलै, २०१७ या कालावधीत महात्मा मंदिर, गांधी नगर, गुजरात येथे आयोजित करण्यात येणाऱ्या आंतरराष्ट्रीय प्रदर्शनात "भागीदार राज्य (Partner State)" म्हणून सहभागी होण्याबाबत मा. मंत्री (वस्त्रोद्योग), भारत सरकार, नवी दिल्ली यांनी मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांना केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने सदर प्रदर्शनात "भागीदार राज्य" (Partner State) म्हणून सहभागी होण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दिनांक ३० जून, २०१७ ते २ जुलै, २०१७ या कालावधीत महात्मा मंदिर, गांधी नगर, गुजरात येथे आयोजित करण्यात येणाऱ्या आंतरराष्ट्रीय प्रदर्शनात "भागीदार राज्य (Partner State)" म्हणून सहभागी होण्यास तसेच त्यासाठीचे शुल्क रु. ८,००,००,०००/- (रुपये आठ कोटी फक्त) इतकी रक्कम Confederation of Indian Industry या संस्थेस, सदर खर्च विहित पद्धतीने करण्याच्या अधीन राहून अदा करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७ अन्वये सन २०१७ -२०१८ मध्ये प्रशासकीय विभागांना अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी वितरित करताना पाळावयाच्या सूचना देण्यात आल्या आहेत. सदर परिपत्रकामधील परिच्छेद क्र. ७ ते १८ पैकी परिच्छेद क्र. ७अ, ९, ११ ते १८ या प्रकरणी लागू नाहीत. परिच्छेद क्र. ७ क) मध्ये नमूद केल्यानुसार, "२६, जाहिरात व प्रसिद्धी" या बाबींवर खर्च करण्यास नियोजन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेने विभागास अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. तसेच सदर परिपत्रकातील परिच्छेद क्र. ७ ब), ८ व १० मधील अटी या प्रकरणी लागू असून त्या अटींची पूर्तता सदर प्रकरणी होत आहे. तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ. क्र. ३ बाबत नमूद करण्यात येते की, योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत

नसल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही. शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ८ मधील तपासणी सूचीतील मुद्यांचीही पूर्तता सदर प्रकरणी होत आहे.

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दिनांक १० मे, २०१६ अन्वये कोषागारात देयके पारित करताना घ्यावयाच्या दक्षतेबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. सदर परिपत्रकातील परिच्छेद- अ) मधील बाबींची प्रस्तुत प्रकरणाशी संबंधित माहिती खालीलप्रमाणे आहे :-

१) **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- विभागाच्या शासन निर्णय क्र. सूतगि-१५११/प्र.क्र.१५३/टेक्स-१ (ब), दिनांक २२ जानेवारी, २०१३ अनुसार "२६, जाहिरात व प्रसिद्धी" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून वित्त विभागाच्या शासन निर्णय दिनांक १८ एप्रिल, २०१७ सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ८ मधील तपासणी सूचीतील सर्व बाबींची पूर्तता या प्रकरणी होत आहे.

२) **मंजूर निधी** :- मागणी क्र. व्ही-२ अंतर्गत मुख्य लेखाशीर्ष "२८५२ - उद्योग" खालील '२०२ वस्त्रोद्याग, राज्य योजनेंतर्गत योजना, (०१) (०१) प्रदर्शने, चर्चासत्रे, जाहिरात, प्रसिद्धी व इतर अनुषंगिक बाबींकरीता अर्थसहाय्य (२८५२ ०४९९), २६ जाहिरात आणि प्रसिद्धी' या उपशीर्षाखाली रु. ३००.०० लाख इतका निधी तसेच संदर्भाधीन दिनांक २७ जून, २०१७ च्या शासन निर्णयान्वये सदर लेखाशीर्षाखाली पुनर्विनियोजनाद्वारे प्राप्त रु. ५००.०० लाख याप्रमाणे एकूण रु. ८००.०० लाख इतका निधी उपलब्ध असून संपूर्ण निधी अखर्चित आहे.

३) **मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे** :- कॉन्फेडरेशन ऑफ इंडियन इंडस्ट्री या संस्थेस सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात यापूर्वी निधी वितरीत करण्यात आलेला नाही.

४) **ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरित करण्यात येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही** :- उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) **स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे** :- लागू नाही.

६) **वैयक्तिक लाभार्थींचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे** :- लागू नाही.

७) **बांधकामविषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिका-याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा** :- लागू नाही.

८) **खरेदी विषयक प्रक्रिया उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या क्र. भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग ॥। / उद्योग-४, दि. १ डिसेंबर, २०१६ च्या अद्ययावत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा** :- लागू नाही.

९) **साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी** :- लागू नाही.

४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-१५११/प्र.क्र.१५३/टेक्स-१ (ब), दिनांक २२ जानेवारी, २०१३ अन्वये वस्त्रोद्योगाच्या विकासाकरीता प्रदर्शने व चर्चासत्रे आयोजित करणे व त्यामध्ये सहभाग घेणे, योजनांची जाहिरात व प्रसिद्धी देणे तसेच वस्त्रोद्योगाच्या विकासाकरीता इतर अनुषंगिक कार्यक्रम राबविणे, इ. बाबींवर खर्च करण्यास नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने वित्तीय अधिकार या विभागास प्राप्त झाले आहेत. त्यानुसार उपरोक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्र. व्ही-२ अंतर्गत मुख्य लेखाशीर्ष "२८५२ उद्योग" खालील '०८ ग्राहकोपयोगी वस्तू उद्योग २०२, वस्त्रनिर्माण, (०१)(०१) प्रदर्शने, चर्चासत्रे, जाहिरात व इतर अनुषंगिक बाबींकरीता ( २८५२ ०४९९) दत्तमत, २६ जाहिरात व प्रसिद्धी' या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित असलेला रु. ३००.०० लाख इतका निधी तसेच संदर्भाधीन दिनांक २७ जून, २०१७ च्या शासन निर्णयान्वये सदर लेखाशीर्षाखाली पुनर्विनियोजनाद्वारे प्राप्त झालेला रु. ५००.०० लाख इतका निधी याप्रमाणे रु. ८००.०० लाख इतका खर्च सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर रक्कम रुपये ८,००,००,०००/- (रु. आठ कोटी फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्यामार्फत CONFEDERATION OF INDIAN INDUSTRY या संस्थेस अदा करण्यासाठी श्री. र. गं. बोड्डू, कार्यासन अधिकारी, रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व श्री. ब. बा. चव्हाण, सह सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. CONFEDERATION OF INDIAN INDUSTRY या संस्थेचा बँक तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| | | |
|---|---|---|
| Account Holder Name | :- | CONFEDERATION OF INDIAN INDUSTRY |
| Bank Name and Address | :- | State Bank of India<br>Andhra Association Building,<br>24/25, Institutional Area, Lodhi Road,<br>New Delhi - 110003. |
| Bank Account Number | :- | 36715485942 |
| IFSC Code | :- | SBIN060321 |

६. सदर शासन निर्णय, या विभागाच्या शासन निर्णय क्र. सूतगि- १५११/ प्र.क्र.१५३/टेक्स-१(ब), दिनांक २२ जानेवारी, २०१३ अन्वये तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारान्वये, संदर्भाधीन दिनांक २७ जून, २०१७ च्या पुनर्विनियोजन शासन निर्णयान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २७४/१७/व्यय-२, दिनांक २७ जून, २०१७ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६२८१७०००२४३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Pramod D. Tupe

Digitally signed by Pramod D. Tupe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Op, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=28590802f030b209e5b1d488527383f61acb2a10c00b8e9718dcbbc845a30f9b, cn=Pramod D. Tupe
Date: 2017.06.28 16:57:28 +05'30'

**(प्रमोद द. तुपे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री ( वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्र.स. (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव, वस्त्र मंत्रालय, भारत सरकार, उद्योग भवन, नवी दिल्ली - ११००११.
५. संचालक, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई .
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
८. महालेखापाल ( लेखा परीक्षा ), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई .
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
११.अवर सचिव - १७ स / कक्ष अधिकारी, कार्यासन १६-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२.कार्यासन अधिकारी, रोख शाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१३.निवडनस्ती ( टेक्स-१ (ब) ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.